**झोपडपट्टी पुनर्वसन योजनेंतर्गतच्या पुनर्वसन सदनिकेचे/अनिवासी गाळयाचे जवळच्या नात्यात हस्तांतरण करताना आकारण्यात येणाऱ्या हस्तांतरण शुल्कात कपात करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृहनिर्माण विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२२/प्र.क्र.१८९/झोपसु-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ०२ ऑगस्ट, २०२३.

**संदर्भ:-** झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरणाचे परिपत्रक क्र.१४५, दि.२४.१०.२०१३.

**प्रस्तावना:-**

झोपडपट्टी पुनर्वसन योजनेंतर्गतच्या निवासी सदनिका/गाळे हस्तांतरीत करताना हस्तांतरणाचे दस्तऐवज नोंदणीकृत करुन घेणे अनिवार्य असून सदर नोंदणीसाठी **निवासी/औद्योगीक/वाणिज्यिक सदनिका/गाळयाकरिता किमान अनुक्रमे रुपये १ लाख/रुपये २ लाख/रुपये ३ लाख इतके हस्तांतरण शुल्क झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरणाच्या संदर्भाधीन परिपत्रकान्वये निश्चित करण्यात आले आहे**.

महसूल व वन विभागाच्या दि.२४.०४.२०१५ रोजीच्या अधिसुचनेन्वये महाराष्ट्र मुद्रांक अधिनियमाच्या अनुच्छेद ३४ मध्ये सुधारणा केली असून त्यानुसार निवासी आणि कृषि मालमत्ता ही पती, पत्नी, मुलगा, मुलगी, नातू, नात, मरण पावलेल्या मुलाची पत्नी यांना बक्षीस दिलेली असेल, तर आकारणीयोग्य शुल्काची रक्कम दोनशे रुपये इतकी निश्चित करण्यात आली आहे.

त्याच धर्तीवर, झोपडपट्टी पुनर्वसन योजनेंतर्गत वितरित करण्यात आलेल्या निवासी पुनवर्सन सदनिकेचे/अनिवासी गाळयाचे विहित कालावधीनंतर सदनिकाधारकाच्या जवळच्या नात्यात म्हणजेच पती, पत्नी, मुलगा, मुलगी, नात, नातू, विधवा सून यांना बक्षीसपत्राद्वारे हस्तांतरण करावयाचे झाल्यास त्यासाठी आकारवयाचे हस्तांतरण शुल्क (Transfer Fees) रु. २००/- इतके निश्चित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

झोपडपट्टी पुनर्वसन योजनेंतर्गत वितरित करण्यात आलेल्या पुनवर्सन सदनिकेचे/गाळयाचे विहित कालावधीनंतर सदनिकाधारक/गाळेधारक यांच्या जवळच्या नात्यात म्हणजेच पती, पत्नी, मुलगा, मुलगी, नात, नातू, विधवा सून यांना बक्षीसपत्राद्वारे हस्तांतरण करावयाचे झाल्यास त्यासाठी रु.२००/- इतके हस्तांतरण शुल्क (Transfer Fees) निश्चित करण्यात येत आहे.

यासंदर्भातील अटी व शर्ती झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरणाच्या परिपत्रक क्र.१४५ मध्ये विहीत केल्यानुसार राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२३०८०२१९२८२८२४०९ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MYLAWARAM DURGAPRASAD P

Digitally signed by MYLAWARAM DURGAPRASAD P
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOUSING DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f4fd0ac26ad2a365a8e829907c5e76b911fed9b1b9e48cc2854c4b8a14b0d70c, pseudonym=C615C97735388C2A3FF7F32D4E4203939DAEDCFD, serialNumber=BEFBB0AE84804C4DA8D35ABF2195EBB1DC727DE9B0A094BEA77F4CA6BE5965DB, cn=MYLAWARAM DURGAPRASAD P
Date: 2023.08.02 19:30:45 +05'30'

**( दुर्गाप्रसाद मैलावरम )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई- ३२.
३. मा.मंत्री (गृहनिर्माण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
४. मा.मुख्य सचिव, यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-३२.
५. अपर मुख्य सचिव (गृहनिर्माण), गृहनिर्माण विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-३२.
६. आयुक्त बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई.
७. मुख्य कार्यकारी अधिकारी, झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण, प्रशासकीय इमारत, अनंत काणेकर मार्ग, वांद्रे (पूर्व) मुंबई-५१.
८. मुख्य कार्यकारी अधिकारी, मुंबई महानगर प्रदेश झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण, ठाणे.
९. मुख्य कार्यकारी अधिकारी, झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण, पुणे व पिंपरी चिंचवड क्षेत्र, पुणे.
१०. निवडनस्ती/ झोपसु-१.